महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२२/प्र.क्र.८३६/सेवा-३**

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: १० एप्रिल, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) शासन शुध्दिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवि-२७१८/प्र.क्र.२/आठ, दिनांक ७ फेब्रुवारी, २०१८.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः मभाप-१०८७/१४/सीआर-२/८७/२०, दिनांक ३० डिसेंबर १९८७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" या पदावर दोन वर्षांच्या परिविक्षा कालावधीकरीता सदर शासन आदेशात असलेल्या खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या नियुक्त्या करण्यात आल्या आहेत. या नियुक्या सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत गठित स्वतंत्र मंडळाने केलेल्या शिफारशीनुसार "वैद्यकीय अधिकारी गट-अ"या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेल्या आहेत.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा येथे नमूद शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून, वैद्यकीय अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा दोन वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी या परिच्छेदातील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे. तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक (म.पू.) स्तंभ क्र.७ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | डॉ. आकाश गोविंद चौधरी | जिल्हा रुग्णालय, जळगांव जि. जळगांव | दि.०१.०२.२०११ | दि.३१.०१.२०१३ | निरंक | दि.०१.०२.२०१३ |
| २ | डॉ. विवेक केशवशरण सक्सेना | संशोधन नि प्रशिक्षण केंद्र, नागपूर | दि.०५.०५.२०१५ | दि.०४.०५.२०१७ | निरंक | दि.०५.०५.२०१७ |
| ३ | डॉ. रश्मी उमराव निघुट(गोडे) | सामान्य रुग्णालय, वर्धा जि. वर्धा | दि.१२.०७.२०१९ | दि.११.०७.२०२१ | निरंक | दि.१२.०७.२०२१ |
| ४ | डॉ. प्रशिक मोहनराव भोयर | ग्रामीण रुग्णालय, दिग्रस, जि. यवतमाळ | दि.०१.१०.२०१६ | दि.०१.११.२०१८ | ३१ दिवस रजा | दि.०२.११.२०१८ |
| ५ | डॉ. शिल्पा धर्मपाल डोंगरे | ग्रामीण रुग्णालय, दिग्रस, जि. यवतमाळ | दि.०८.११.२०१७ | दि.०५.०५.२०२० | १८० दिवस रजा | दि.०६.०५.२०२० |
| ६ | डॉ. जयवंत कथ्थु पाटील | जिल्हा रुग्णालय, नंदुरबार, जि. नंदुरबार | दि.०४.१०.२०१२ | दि.०३.१०.२०१४ | निरंक | दि.०४.१०.२०१४ |
| ७ | डॉ. नंदकिशोर दत्तात्रय घाडगे | प्रा. आ. कें. मंगरुळ ता. कळंब, जि. उस्मानाबाद | दि.२०.०५.२०१५ | दि.१०.०६.२०१७ | २२ दिवस रजा | दि.११.०६.२०१७ |
| ८ | डॉ. प्रविण हरीदास बुटोलीया | उपजिल्हा रुग्णालय, वरोरा, जि. चंद्रपूर | दि.२६.०८.२०११ | दि.२५.०८.२०१३ | निरंक | दि.२६.०८.२०१३ |
| ९ | डॉ. सारिका बाबुराव जाजुलवार | उपजिल्हा रुग्णालय, रामटेक, जि. नागपूर | दि.२४.०७.२०१४ | दि.१९.०१.२०१७ | १८० दिवस रजा | दि.२०.०१.२०१७ |
| १० | डॉ. समिर गोविंदराव थेरे | प्रा. आ. कें. वेगांव जि. यवतमाळ | दि.११.११.२०१४ | दि.१०.११.२०१६ | निरंक | दि.११.११.२०१६ |
| ११ | डॉ. प्रदिप सिताराम राजपूत | प्रा. आ. कें. बनोटी, ता. सोयगांव जि. औरंगाबाद | दि.११.११.२०१५ | दि.१०.१२.२०१७ | निरंक | दि.११.१२.२०१७ |

२. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा अभियान संचालक, रा.आ.अ., मुंबई यांना कळविण्यात येते की, उक्त वैद्यकीय अधिकारी यांच्या पुढील वेतनवाढी नियमानुसार व विहित तरतुदीनुसार मुक्त करण्याच्या अनुषंगाने तात्काळ उचित कार्यवाही करावी.

१. डॉ. विवेक केशवशरण सक्सेना यांना मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.०९.०१.२०२२ पासून सूट मिळाली आहे जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.०४.०५.२०१७ रोजी समाप्त होवून अ.क्र.०७ येथे नमूद

केल्यानुसार त्यांची वैद्यकीय अधिकारी या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.०५.०५.२०१७ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.०९.०१.२०२२ पर्यंत रोखून पुढे त्यांना वेतनवाढी देय होईल.

२. डॉ. जयवंत कथ्थु पाटील यांना मराठी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.०३.०१.२०२१ पासून सूट मिळाली आहे जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.०३.१०.२०१४ रोजी समाप्त होवून अ.क्र.०७ येथे नमूद केल्यानुसार त्यांची वैद्यकीय अधिकारी या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.०४.१०.२०१४ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.०३.०१.२०२१ पर्यंत रोखून पुढे त्यांना वेतनवाढी देय होईल.

३. डॉ. नंदकिशोर दत्तात्रय घाडगे यांना हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून दि.०८.०८.२०२१ पासून सूट मिळाली आहे जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.१०.०६.२०१७ रोजी समाप्त होवून अ.क्र.०७ येथे नमूद केल्यानुसार त्यांची वैद्यकीय अधिकारी या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.११.०६.२०१७ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी दि.०८.०८.२०२१ पर्यंत रोखून पुढे त्यांना वेतनवाढी देय होईल.

३. सदर शासन आदेश वाचा येथे नमूद शासन निर्णय/शुध्दीपत्रक यांमधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२८२०४११०९८१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SANJAY DHONDU DAGALE

Digitally signed by SANJAY DHONDU DAGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=91c5ac1bc356eb88dac279997c206f0bc13ac253742cc3f97488b07c83657b5f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02E1EAC848EB66AA47BB931E6668D24F8AEF7B3F3FA0341F35962CC85B518C62, cn=SANJAY DHONDU DAGALE
Date: 2023.04.10 13:25:30 +05'30'

(सं. धों. डगळे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा संचालक, रा.आ.अ, आरोग्य भवन,मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.

४. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७. उपसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय (नाशिक, नागपूर, अकोला, लातूर, औरंगाबाद.)
८. जिल्हा शल्य चिकित्सक (जळगांव, नागपूर, वर्धा, यवतमाळ, नंदुरबार, उस्मानाबाद, चंद्रपूर, औरंगाबाद) .
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (जळगांव, नागपूर, वर्धा, यवतमाळ, नंदुरबार, उस्मानाबाद, चंद्रपूर, औरंगाबाद).
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (जळगांव, नागपूर, वर्धा, यवतमाळ, नंदुरबार, उस्मानाबाद, चंद्रपूर, औरंगाबाद).
११. संबंधित वैद्यकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत.
१२. निवडनस्ती (कार्यासन सेवा-३).